**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) सर्व पदांवर पदोन्नतीकरीता गठित विभागीय पदोन्नती समितीमध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आपना ०२२१/प्र.क्र.१०२/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०८ मार्च, २०२३

वाचा -

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन १२, दि. ०१.०८.२०१९**
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः आपना-०२२१/प्र.क्र.१०२/पापु-१५, दि. १८.०८.२०२१**

प्रस्तावना -

राज्यस्तरावरील गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) या सर्व पदांवर अधिकारी/कर्मचारी यांचे पदोन्नतीकरीता विचार करण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठित करणेबाबतची संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतूद विचार घेता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) संवर्गातील पदांवर पदोन्नतीकरीता अधिकारी/कर्मचारी यांचा विचार करण्यासाठी आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे अध्यक्षतेखाली संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागीय पदोन्नती समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीमध्ये उप सचिव, पापु-१५, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचा सदस्य म्हणून समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) संवर्गातील पदांवर पदोन्नतीकरीता अधिकारी/कर्मचारी यांचा विचार करण्यासाठी खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समितीमध्ये सुधारणा करण्यात येत आहे.

| विभागीय पदोन्नती समिती | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त संचालक/सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | सदस्य |
| ३ | उप सचिव, पापु-१५, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |

| विभागीय पदोन्नती समिती | | |
|---|---|---|
| ४ | सहसंचालक/उपसंचालक/वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावरील मागासवर्गीय प्रवर्गातील कार्यरत अधिकारी (आयुक्तांनी नामनिर्देशित केलेला) | सदस्य व मागासवर्गीय प्रतिनिधी |
| ५ | प्रशासन अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,पुणे | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०३०८१७५३३११५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.03.09 11:52:48 +05'30'

( गणेश पवार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
३. अतिरिक्त संचालक/सर्व सहसंचालक/सर्व उपसंचालक/सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
४. निवडनस्ती (पापु-१५)